**अखिल भारतीय हिंदु - बंजारा नायकडा कुंभ करीता पाणी पुरवठा आणि मलनिस्सारण व स्वच्छता सुविधेसाठी निधी वितरणाबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२२/प्र.क्र.९७५/पापु १०**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,मंत्रालय
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २७ मार्च,२०२३

वाचा-

१. **शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं -२०२२/ प्र.क्र.४३/ अर्थ -३, दि.०४.०४.२०२२**
२. **मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांचे पत्र क्र.ग्रापापुवि/तांशा-३ /आरआर/७७१/२०२२, दि.०८.१२.२०२२**
३. **शासन निर्णय समक्रमांक दि.२३.१२.२०२२**
४. **कार्यकारी अभियंता, ग्रा.पा.पु.वि. जिल्हा परिषद, जळगाव यांचे पत्र क्र.ग्रा.पा.पु.वि/लेखा -४/आरआर/२६९/२०२३, दि.२८.०२.२०२३**

प्रस्तावना-

ग्रामपंचायत गोद्री ता.जामनेर जि.जळगाव येथे होणा-या अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या मलनिस्सारण व स्वच्छता सुविधा या कामांसाठी रु.१,३५,३१,६५५/- (रुपये- एक कोटी पस्तीस लक्ष एकतीस हजार सहाशे पंचावन्न) व पाणी पुरवठा सुविधांकरीता रु.७६,२५,८९०/- (रुपये -शहात्तर लक्ष पंचवीस हजार आठशे नव्वद) निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांनी संदर्भिय क्र.२ च्या पत्रान्वये शासनास सादर केला होता. त्याअनुषंगाने वित्त विभागाकडे प्रस्ताव सादर केला असता वित्त विभागाने एक अपवादात्मक बाब म्हणून जळगाव जिल्ह्यातील गोद्री ता.जामनेर येथील अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या मलनिस्सारण व स्वच्छतेच्या सुविधेकरीता स्वच्छ भारत अभियान (ग्रा.) टप्पा-२ अंतर्गत लेखाशीर्ष २२१५ २१८९ मधुन रु.१,३५,३१,६५५/- तर जल जीवन मिशन अंतर्गत लेखाशीर्ष २२१५ २०७१ अंतर्गत रु.७६,२५,८९०/- इतका निधी वितरणास मान्यता दिलेली होती. तथापि, हा निधी आहरित करण्याकरीता बीडीएस काढताना अडचणी येत असल्याचे कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, जळगाव यांनी संदर्भिय क्र.४ दि.२८.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे. त्याअनुषंगाने याबाबत लेखा व कोषगारे संचालनालय, मुंबई यांच्या कार्यालयातील बील्स पोर्टल शाखेत विचारणा केली असता त्यांनी

उक्त वितरित निधी हा केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत लेखाशीर्षातून वितरित केलेला असल्याने व या योजनेंतर्गत निधी SNA (Single Nodal Agency) खात्याशी नोंदविण्यात आलेल्या आहरण संवितरण अधिकारी यांच्यामार्फत SNA खात्यातुन वितरित करणे आवश्यक असल्याचे अभिप्राय कळविले आहे. याकरीता प्रस्तुत प्रकरणी संदर्भिय क्र.३ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन उक्त निधी संबंधित कार्यक्रमांतर्गत Single Nodal Agency खात्यात वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## <u>शासन निर्णय-</u>

अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या मलनिस्सारण व स्वच्छता सुविधा व पाणी पुरवठ्याकरीता निधी वितरणाबाबतचा संदर्भिय क्र.३ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन जल जीवन मिशन अंतर्गत सन २०२२- २०२३ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधारण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, (०२), जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (१५) नळाव्दारे पाणी पुरवठा योजना- जल जीवन अभियान यासाठी अनुदान (राज्यक्षेत्र), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) (२२१५ २०७१) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीतून रु.७६,२५,८९०/- (अक्षरी-रु. शहात्तर लक्ष पंचवीस हजार आठशे नव्वद फक्त) इतका निधी वित्त विभागाने ग्रामपंचायत गोद्री ता.जामनेर जि.जळगाव येथे होणा-या अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या पाणी पुरवठा सुविधेकरीता विशेष बाब म्हणून वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे. हा निधी राज्य पाणी व स्वच्छता मिशनला जल जीवन मिशन कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक वित्तीय व्यवस्थापन प्रणालीकरीता उघडण्यात आलेल्या राज्य नोडल खात्यामध्ये जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. राज्य पाणी व स्वच्छता मिशन (Jal Jeevan Mission Maharashtra Escrow Account) या नावाने उघडण्यात आलेल्या एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code-HDFC०००० १४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करण्यात यावा. हा निधी जमा झाल्यानंतर सदरचा निधी तातडीने जिल्हा परिषद, जळगाव कार्यालयास वितरित करण्याबाबतची कार्यवाही मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०३. सदर रक्कम आहरित करण्यासाठी (पी.एफ.एम.एस. योजना केंद्र सांकेतांक ९१५० व राज्य सांकेतांक MH ३९९) आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव (रोखशाखा) यांना व नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर रक्कम आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व

स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी एच.डी.एफ.सी.बँक लिमिटेड, तलाव पाली, ठाणे (IFSC Code- HDFC००००१४६) येथील खाते क्र.५०१००५३०८६०६०७ मध्ये जमा करावी. मिशन संचालक, जल जीवन मिशन यांनी सदर रक्कम रु.७६,२५,८९०/- मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगाव यांना पाणी पुरवठा सुविधेकरीता तात्काळ वितरित करावी.

०४. तसेच, स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) अंतर्गत सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षामध्ये सर्वसाधरण घटकांतर्गत (राज्य हिस्सा) मागणी क्र.वाय-०२, लेखाशीर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०२ मलप्रणाल व स्वच्छता, १०७ मलप्रणाल सेवा, (०२) ग्रामीण स्वच्छता कार्यक्रम (०२) (०५) स्वच्छ भारत मिशन (कें.पु.यो) (राज्य हिस्सा) (कार्यक्रम) ३३, अर्थसहाय्य, (२२१५ २१८९) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध निधीतून रु.१,३५,३१,६५५/- (रुपये एक कोटी पस्तीस लक्ष एकतीस हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतका निधी वित्त विभागाने ग्रामपंचायत गोद्री ता.जामनेर जि.जळगाव येथे होणा-या अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या मलनिस्सारण व स्वच्छता सुविधा कामासाठी विशेष बाब म्हणून वितरित करण्यास मान्यता दिली आहे.

०५. सदर निधी स्वच्छ भारत मिशन (ग्रा) योजनेंतर्गत उघडण्यात आलेल्या Single Nodal Agency account मध्ये जमा करण्यात यावा.

०६. याकरीता नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. आहरण व संवितरण अधिकारी तथा अवर सचिव (पापु-११), (श्री. अ.नि.धस), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर रु.१,३५,३१,६५५/- (रुपये एक कोटी पस्तीस लक्ष एकतीस हजार सहाशे पंचावन्न फक्त) इतका निधी अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून आहरीत करुन प्रकल्प संचालक, (स्वच्छ भारत मिशन) राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई यांच्यातरावर स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) योजनेंतर्गत उघडण्यात आलेल्या SNA खात्यामध्ये जमा करावा. हा निधी जमा झाल्यानंतर तातडीने जि.प. जळगाव कार्यालयास वितरित करण्याबाबतची कार्यवाही अभियान संचालक (स्व.भा.मि.), राज्य पाणी व स्वच्छता मिशन यांच्याद्वारे करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०७. तद्नंतर मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.जळगाव यांनी उक्त रु.७६,२५,८९०/- इतक्या निधीतून अखिल भारतीय हिंदु-बंजारा नायकडा कुंभ या कार्यक्रमाच्या पाणी पुरवठा सुविधेकरीताचे देयक व रु.१,३५,३१,६५५/- इतक्या निधीतून मलनिस्सारण व स्वच्छता सुविधासाठीचे देयक तपासून अदा करावे.

०७. या शासन निर्णयाद्वारे वितरित केलेला निधी ज्या कारणासाठी वितरित केला आहे त्याच कारणासाठी खर्च करण्यात यावा. सदर तरतूद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या दि.०४.०४.२०२२ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

०८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.सं.क्र.२०२२/ शिकाना-३५, दि.२२.१२.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२७१२१८२३०७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD SWAMI

Digitally signed by PRASAD SWAMI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=aaf002dc55f52d8292cd1b600e0a80b7cf51b57c6f840c909c76407640c157f4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8D84D41A9008354A0AF034B551119753B7D1C967B179AC7110EAA1867A160049, cn=PRASAD SWAMI
Date: 2023.03.27 13:08:05 +05'30'

**(प्रसाद स्वामी)**
कक्ष अधिकारी,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अभियान संचालक, स्वच्छ भारत अभियान, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, नवी मुंबई
२. उपसचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अवर सचिव (रोख शाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अवर सचिव (पापु -११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

यांना विनंती करण्यात येते की, वरीलप्रमाणे निधी तातडीने संबंधित खात्यात जमा करण्यात यावा.

**प्रत,**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
३. मिशन संचालक, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई
४. सह सचिव/ उप सचिव (अर्थसंकल्प), नियोजन व वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई

७. अवर सचिव (पापु ०८), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवडनस्ती- कार्यासन पापु १०